अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग
व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५
मधील तरतुदीनुसार महाराष्ट्र लघुउद्योग
विकास महामंडळ मर्या, मुंबई यांच्या
आस्थापनेवरील गट-अ,ब,क व ड मधील
पदांवर अपंग व्यक्तींना आरक्षण विहित
करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
शासन निर्णय क्र. अपंग-२०१०/प्र.क्र.९३/उद्योग-६
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८ जानेवारी, २०११.

वाचा :-
१) अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५ (१९९६ चा- १)
२) शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही १०९८/प्र.क्र.१२/१६-अ दिनांक २ मे १९९८.
३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.न्यायाप्र-२००९/प्र.क्र.५/सुधार-३ दिनांक ३ ऑगस्ट २०१०.

**प्रस्तावना :-** अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५ (१९९६ चा-१) हा अधिनियम दिनांक ७ फेब्रुवारी, १९९६ पासून लागू झाला आहे. या कायद्यान्वये अपंगांच्या सर्वांगीण विकासासाठी व त्यांना सामाजिक सुरक्षा प्रदान करण्यासाठी शासन सेवेत ३% पदे आरक्षित करण्याची तरतूद आहे. त्याकरिता अपंग व्यक्तींसाठी पदनिश्चिती केलेली आहे. त्यानुसार या विभागाच्या अखत्यारितील महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळाच्या सेवेतील गट-अ, ब, क व ड मधील पदांवर शारिरिकदृष्ट्या अपंगांसाठी आरक्षण ठेवण्याकरिता पदनिश्चित करण्यात आली नव्हती.

शासनाच्या विविध विभागामार्फत अपंगासाठी राखून ठेवण्यात आलेल्या पदाच्या पदनिश्चितीमध्ये एकवाक्यता नाही किंवा ती परिपूर्ण नाही यासाठी अपंग व्यक्तींसाठी सुधारित पद निश्चिती करणे व त्या अनुषंगाने अपंगांची राखीव पदे भरणे यासंदर्भात मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे जनहित याचिका क्रमांक २२५/२००९ दाखल करण्यात आली आहे. या याचिकेसंदर्भात मा.उच्च न्यायालयाने शासकीय व निमशासकीय सेवेतील पदे केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार अपंगासाठी सुनिश्चित करणेबाबतचे निर्देश दिले आहेत. त्यास अनुसरुन संदर्भ क्रमांक ३ येथील दिनांक ३ ऑगस्ट, २०१० च्या शासन निर्णयान्वये सूचित केल्याप्रमाणे या विभागाच्या अखत्यारितील महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळाच्या सेवेतील पदे केंद्र शासनाच्या मार्गदर्शक

सूचना तसेच अपंगांच्या पदनिश्चितीबाबत प्रसिध्द केलेल्या यादीनुसार अपंगासाठी सुनिश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-** अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५ (१९९६ चा-१) हा अधिनियम दिनांक ७ फेब्रुवारी, १९९६ पासून लागू झाला आहे. या अधिनियमाच्या अनुषंगाने शासनाने संदर्भ क्रमांक २ येथील सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २ मे १९९८ च्या शासन निर्णयान्वये शासन सेवेत अंध व अंशत: अंध, कर्णबधीर, चलनवलन विषयक विकलांगता किंवा मेंदूचा आजार या व्याधीने ग्रस्त झालेल्या व्यक्तींसाठी सरळसेवा भरतीमध्ये आरक्षण ठेवण्याच्या सूचना प्रशासकीय विभागांना निर्गमित केलेल्या आहेत. तसेच संदर्भ क्रमांक ३ येथील सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दिनांक ३ ऑगस्ट २०१० नुसार शासकीय व निमशासकीय सेवेतील पदे केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार अपंगासाठी सुनिश्चित करणेबाबतचे निर्देश दिले आहेत. त्यानुसार महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळाच्या सेवेतील "अ", "ब", "क" व " ड" या गटात अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५ च्या तरतुदीनुसार केंद्र शासनाच्या कार्यालयात कार्यरत असलेल्या आणि यंत्रणेत समान पदावर कार्यरत असलेल्या पदांसाठी सरळ सेवा भरतीबाबत आरक्षण ठेवण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. शासनाने संदर्भ क्रमांक ३ दिनांक ३ ऑगस्ट, २०१० च्या परिपत्रकानुसार सूचित केल्याप्रमाणे महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळाच्या सेवेतील "अ", "ब", "क" व " ड" या गटातील कोणत्या पदासाठी कोणत्या वर्गवारीतील अपंग व्यक्तीसाठी आरक्षण ठेवावे याबाबत शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे.

**(१)** अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५ (१९९६ चा-१) या अधिनियमातील कलम ३२ व ३३ नुसार उद्योग,उर्जा व कामगार विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळांतर्गत गट "अ", "ब", "क" व " ड" मधील विविध संवर्गातील पदांवर अपंगत्वाचे प्रमाण किमान ४० टक्के असलेल्या अपंग व्यक्तींना ३% पर्यंत फक्त सरळसेवा भरतीमध्ये आरक्षण ठेवण्यात यावे.

**(२)** संबंधितांकडून उमेदवारांची शिफारस प्राप्त झाल्यावर अशा उमेदवारास शारीरिक पात्रतेसंदर्भात विहीत केलेल्या वैद्यकीय मंडळाने प्रस्तावित केल्यानंतरच अशा अपंग व्यक्तींची महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळांतर्गत गट "अ", "ब", "क" व " ड" मधील पदांवर नियुक्ती करण्यात यावी. याशिवाय खालील निकषानुसार अशा अपंग व्यक्तींची सरळसेवा भरतीने नियुक्ती करण्यात यावी.

**अ)** संबंधित सेवाप्रवेश नियमाच्या तरतुदीनुसार अर्हता असेल तर,

**ब)** त्या त्या संवर्गातील पदांची कर्तव्य व जबाबदा-या लक्षात घेऊन त्याप्रमाणे वैद्यकीय मंडळाने सक्षम ठरविल्यास,

**क)** महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळांतर्गत गट “अ”, “ब”, “क” व “ड” मधील विविध संवर्गात सोबतच्या परिशिष्ट “अ” मध्ये दर्शविल्यानुसार अपंगत्वाच्या प्रत्येक प्रकारास प्रत्येकी १% याप्रमाणे एकूण ३% पर्यंत सरळसेवा भरतीने आरक्षण ठेवून नियुक्ती करण्यात यावी.

**(३)** महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ, मुंबई यांच्या आस्थापनेवरील गट “अ”, “ब”, “क” व “ ड” गटाची सरळसेवा भरतीने भरावयाच्या पदांसाठी अपंग उमेदवारासाठी शारिरीक पात्रतेचे निकष कोणते असावेत याचा तपशील सोबतच्या “परिशिष्ट-अ” मध्ये दिलेला आहे. त्या निकषांवर अशा अपंग व्यक्तीची सरळसेवा भरतीने नियुक्ती करण्यात यावी.

**(४)** शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग दिनांक १९/३/२०१० मधील तरतुदीनुसार अपंगाची आरक्षित पदे सरळसेवेने भरताना ती सामाजिक प्रवर्गात न दर्शविता ती स्वतंत्रपणे दर्शविण्यात येऊन अपंगाची पद भरती करण्याची कार्यवाही करावी मात्र निवड झालेल्या उमेदवारांना ते ज्या प्रवर्गातील असतील त्याच प्रवर्गात समांतर आरक्षण म्हणून सामावून घेण्यात यावे.

**(५)** पदोन्नतीच्या पदास व एकाकी पदास सदर अपंगाचे आरक्षण लागू रहाणार नाही. महामंडळांतर्गत गट “अ”, “ब”, “क” व “ ड”मधील विविध संवर्गात सोबतच्या परिशिष्ट “अ” मध्ये दर्शविल्यानुसार अपंगत्वाच्या प्रत्येक प्रकारास प्रत्येकी १% याप्रमाणे एकूण ३% पर्यंत सरळसेवा भरतीने आरक्षण ठेवून नियुक्ती करण्यात यावी.

**(६)** हे आदेश सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्र.एसआरव्ही-१०९८/प्र.क्र.१२/१६-अ, दिनांक २ मे, १९९८ व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र.न्यायाप्र-२००९/ प्र.क्र.५/सुधार-३, दिनांक ३ ऑगस्ट, २०१० च्या अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**(७)** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in येथे उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०११०१२८२१५३०६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(मोहन पांढरकामे)
शासनाचे अवर सचिव

प्रति :- माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित :-

१. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. मा.राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

५. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा) मुंबई.

६. प्रधान सचिव (विधानसभा), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.

७. प्रधान सचिव (विधान परिषद), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.

८. प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.

१०. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.

११. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्यादित, मुंबई.

१२. वित्त नियंत्रक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्यादित, मुंबई.

१३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञयेता/लेखापरीक्षा), मुंबई.

१४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञयेता/लेखापरीक्षा), नागपूर.

१५. वरिष्ठ उपमहालेखापाल (पडताळणी) बाह्य लेखा परीक्षा विभाग, मुंबई.

१६. लेखा अधिकारी, उद्योग संचालनालय, मुंबई.

१७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१८. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

१९. वित्त विभाग (व्यय-१६/सेवा-९) मंत्रालय, मुंबई.

२०. कक्ष अधिकारी (प्रशासन-१/४) उद्योग,उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

२१. निवड नस्ती/ उद्योग-६.

शासन निर्णय क्र.अपंग-२०१०/प्र.क्र.९३/उद्योग-६, दिनांक २८ जानेवारी, २०११ चे सहपत्र.

## परिशिष्ट - "अ"

**महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळाच्या आस्थापनेवरील गट "अ", "ब", "क" व "ड" मध्ये सरळसेवा भरतीने नियुक्ती करण्यासाठी केंद्र शासनाच्या निकषांच्या धर्तीवर अपंग व्यक्तींसाठी शारीरिक निकष**

(केंद्र शासनाने अपंगांच्या पदनिश्चितीबाबत प्रसिध्द केलेल्या यादीनुसार)

| अ.क्र. | पदनाम | पद भरतीचा प्रकार | अंध | अस्थिव्यंग | मुक/बधिर |
|---|---|---|---|---|---|
| | गट - "अ" | | | | |
| १ | व्यवस्थापक | सरळसेवाभरती | LV | OL,BL,OA | HH |
| २ | उप व्यवस्थापक | सरळसेवाभरती | LV | OL,BL,OA | HH |
| | गट - "ब" | | | | |
| ३ | सहाय्यक व्यवस्थापक | सरळसेवाभरती | LV | OL,BL,OA | HH |
| | गट - "क" | | | | |
| ४ | कनिष्ठ श्रेणी लघुलेखक | सरळसेवाभरती | LV | OL,BL,OA | HH |
| ५ | सहाय्यक | सरळसेवाभरती | LV | OL,BL,OA | HH |
| ६ | कनिष्ठ सहाय्यक | सरळसेवाभरती | LV | OL,BL,OA | HH |
| ७ | कनिष्ठ लिपिक | सरळसेवाभरती | LV | OL,BL,OA | HH |
| | गट - "ड" | | | | |
| ८ | वरिष्ठ शिपाई/शिपाई | सरळसेवाभरती | LV | OL,BL,OA | HH |
| ९. | वरिष्ठ सफाई कामगार/सफाई कामगार | सरळसेवाभरती | LV | - | HH |

**Abbreviations Used :-**

| | | |
|---|---|---|
| B | : | Blind |
| L.V. | : | Low Vision |
| OL | : | One Leg |
| OA | : | One Arm |
| OAL | : | One Arm & One Leg |
| BL | : | Both Leg |
| BA | : | Both Arms |
| BLA | : | Both Legs & Arms |
| HH | : | Hearing Handicapped |
| OH | : | Orthopaedically Handicapped |